**महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीम**
दिनांक:-२ ऑक्टोबर,२०१० रोजी
मोहीमेची जाहीरात वृत्तपत्रामधून प्रसिध्द
करण्याच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक तंमुगा-१०१०/प्र.क्र. १०४/२०१०/पोल-१५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक:- ३० मार्च, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक तंमुगा-१००८/प्र.क्र. ४३/२००८/पोल-१५, दि. १४ ऑगस्ट, २००८
२) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक तंमुगा-१०१०/प्र.क्र. १०४/२०१०/पोल-१५, दि. ३० डिसेंबर, २०१०
३) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक तंमुगा-१०१०/प्र.क्र. १०४/२०१०/पोल-१५, दि. ७ मार्च, २०११.
४) शासन शुद्धिपत्रक गृह विभाग क्रमांक तंमुगा-१०१०/प्र.क्र.१०४/२०१०/पोल-१५, दि. ९ मार्च, २०११.

**शासन निर्णय :-** संदर्भीत क्रमांक (१) येथील आदेशातील तरतूदीनुसार महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीमेची जाहीरात विविध दृकश्राव्य माध्यमे तसेच प्रिंट माध्यमांव्दारे प्रसारीत करण्यात येत आहे. दि. २ ऑक्टोबर, २०१० रोजी महात्मा गांधी यांच्या जयंतीचे औचित्य साधून मोहीमेच्या अंमलबजावणीची जाहिरात राज्यातील सर्व 'ब' व 'क' वर्गवारीतील वृत्तपत्रामधून प्रसारीत करण्यात आली होती. सदर जाहीरात प्रसारणाची ३१६ वृत्तपत्रांची देयके संदर्भात नमूद (२) येथील आदेशान्वये मंजूर करण्यात आली आहेत व तद्नंतर दि. ९ मार्च, २०११ च्या शासन शुद्धिपत्रकान्वये त्यात सुधारणा करुन ३१३ देयकांसाठी रुपये ११,९७,१००/- इतक्या खर्चास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच दि. ७ मार्च, २०११ च्या आदेशान्वये ५५ वृत्तपत्रांच्या जाहिरातीच्या रु. २,०४,८००/- इतक्या खर्चास मंजूरी देण्यात आली आहे.

०२. दि. २/१०/२०१० रोजी जाहीरात प्रसारीत केल्यासंबंधीची राज्यातील 'ब' व 'क' वर्गवारीतील आणखी ०९ वृत्तपत्राची देयके या विभागास प्राप्त झाली आहेत. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने सदर देयके तपासून ते शासनमान्य दरानुसार योग्य असल्याचे नमुद केले आहे. या देयकाचे विवरणपत्र सोबत जोडले आहे. या ९ देयकांसाठी एकूण रु. ३६,८००/- (रुपये छत्तीस हजार आठशे फक्त) इतका खर्च आला असून त्यास या आदेशान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

०३. प्रमाणित करण्यात येते की, सदरचा खर्च मोहीमेची जाहीरात, प्रसिध्दी व प्रचार यावर करण्यात आला असून यापूर्वी त्याची अदायगी करण्यात आलेली नाही. सदरचा खर्च विहित पध्दतीचा अवलंब करुन केलेला आहे.

०४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे वृत्तपत्राच्या देयकाच्या रुपये ३६,८००/- (रुपये छत्तीस हजार आठशे फक्त) इतक्या खर्चाच्या रकमे इतक्या तरतुदीचे जिल्हानिहाय वितरण करतील आणि संबंधित जिल्हा पोलीस अधीक्षक जिल्ह्यातील वृत्तपत्रांच्या देयकांच्या रकमेचे धनादेश तयार करुन त्याचे वितरण करतील.

०५. यावर होणारा खर्च रुपये ३६,८००/- (रुपये छत्तीस हजार आठशे फक्त) गृह विभाग मागणी क्र. "बी-१, प्रधान लेखाशिर्ष २०५५ पोलीस (००) (१०) तंटामुक्त गाव मोहीम (२०५५०५३३) २६ जाहीरात व प्रसिध्दी " या खालील सन २०१०-११ या वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०६. सदरचा शासन निर्णय राज्यशासनाच्या वेबसाईटवर टाकण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०३२२१३४१५२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

**(बि. फ. बसावे)**
कार्यासन अधिकारी, गृहविभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
जिल्हा पोलीस अधीक्षक, अकोला, नांदेड, वाशिम, लातूर, जळगाव, अमरावती, अहमदनगर, व सातारा
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग (कार्यासन व्यय-७/अर्थ-२ व अर्थ-११), मंत्रालय, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला, नांदेड, वाशिम, लातूर, जळगाव, अमरावती, अहमदनगर,व सातारा
निवडनस्ती, पोल-१५

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र. तंमुगा १०१०/प्र.क्र.१०४/२०१०/पोल-१५, दि. ३० मार्च, २०११ चे विवरणपत्र

दि. २/१०/२०१० रोजी प्रसारीत केलेल्या जाहिरातीच्या वृत्तपत्रांची यादी.

| अ. क्र. | संदर्भ क्रमांक | वृत्तपत्राचे नाव | देयक क्रमांक व दिनांक | देयकाची रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | ५१ | दै. लोकशक्ती, अकोला | ६४५, दि. २/१०/१० | २,८०० |
| २ | ५२ | दै. लोकपत्र, नांदेड | ३९१, दि. २/१०/१० | ५,२०० |
| ३ | ५३ | दै. लोकशक्ती, वाशिम | ६४६, दि. २/१०/१० | ३,२०० |
| ४ | ५५ | दै. मराठवाडा केसरी, लातूर | १६३, दि. २/१०/१० | ५,२०० |
| ५ | ५६ | सायं दै. आपलं मन, लातूर | ३६४, दि. -- | ३,६०० |
| ६ | ५७ | सांज दै. यावल समाचार, यावल, जि. जळगांव | २८६, दि. ५/१०/१० | २,८०० |
| ७ | ५९ | दै. परिवर्तन समाचार, अमरावती | १२५८, दि.३०/१/११ | ४,००० |
| ८ | ८० | दै. पुढारी, अहमदनगर | ११६८९, दि.२/१०/१० | ७,२०० |
| ९ | १३८ | दै. प्रीतीसंगम, सातारा | १७७, दि. २/१०/१० | २,८०० |
| | | | एकूण | ३६,८००/- |